शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद या संस्थेस यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : यंत्रख-२०२३/प्र.क्र.२२९/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : ०५ जुलै, २०२३

वाचा :
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०२१/प्र.क्र.८/ उद्योग-४, दिनांक ०७/०५/२०२१.
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.DMER-२२०११-१४४/२०२३-PROC१, दिनांक २१.०६.२०२३.

शासन निर्णय :

उपरोक्त नमूद दिनांक २१.०६.२०२३ रोजीच्या पत्रान्वये संचालनालयाने विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद या संस्थेच्या क्ष-किरण विभागासाठी रुग्णसेवेकरीता आवश्यक डीजीटल मेमोग्रॉफी ही यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या Strengthening of Tertiary Care for Cancer Scheme of National Program for Prevention & Control of Cancer, Diabetes, Cardiovascular Diseases & Stroke (NPCDCS) योजनेंतर्गत संस्थेस केंद्र शासन ६० टक्के हिस्सा अंतर्गत मंजूर व SNA खात्यात जमा अनुदानातून रुपये २,३०,००,०००/- (रुपये दोन कोटी, तीस लक्ष मात्र) इतक्या किंमतीची खालील तक्त्यात नमूद यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नाव | नग संख्या | प्रती नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | डीजीटल मेमोग्राफी | १ | २,३०,००,००० | २,३०,००,००० |
| एकूण | | | | २,३०,००,००० |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता केंद्र शासन हिस्सा अंतर्गत मंजूर अनुदानातून संबंधित संस्थेस निधी उपलब्धतेच्या अधिन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर साधनसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

४) सदर साधनसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मितीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात यावी.

५) सदर साधनसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी प्रमाणित करावे.

६) प्रस्तावित साधनसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी खात्री करावी.

७) मुख्य साधनसामुग्री व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

८) सदर विषयी साधनसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या साधनसामुग्रीच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. प्रस्तुत विषयी यंत्रसामुग्रीसाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३ - वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५ - विषम चिकित्सा
(००) (५१) - राष्ट्रीय कार्यक्रम-कर्करोग, मधुमेह, हृदयविकार आणि आघात यावरील प्रतिबंध व नियंत्रण (केंद्र हिस्सा ६० टक्के)
५२ - यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० २५८१)

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०५१४०४३६६६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.07.05 18:21:14 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२. महालेखाकार - १/२ ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो-फार्मास्युटीकल कॉर्पोरेशन लि., मुंबई
५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद
६. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
७. निवडनस्ती (प्रशा-१).